संगणक सांकेतांक
२०१००८२४१७५१४६००१

**स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत स्थापित वर्गवारी-२ पार केलेल्या स्वयंसहायता गटांना मासिक लोकराज्यचे सभासद करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक संकिर्ण-२०१०/प्र.क्र.१३०/योजना-३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: २४ ऑगस्ट, २०१०

**परिपत्रक :-**

स्वर्णजयंती ग्राम स्वरोंजगार योजने अंतर्गत स्थापित स्वयंसहायता गटांना शासकीय अनुदान व बँकेमार्फत कर्ज मिळवून देवून त्यांना आर्थिक उपक्रम सुरु करण्यासाठी उद्युक्त करण्यात येते. स्वयंसहायता गटांच्या प्रशिक्षणासाठी, बळकटीकरणासाठी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांकडून अथक प्रयत्न करण्यात येत आहेत. याशिवाय स्वयंसहायता गटांना राज्य शासनाने घेतलेले निर्णय, राज्यात राबविण्यात येणाऱ्या अन्य योजना, मंत्रीमंडळ निर्णय, अन्य जिल्ह्यातील स्वयंसहायता गटांच्या यशोगाथा, उपक्रम इ.माहिती मासिक लोकराज्य मधून स्वयंसहायता गटांपर्यंत पोहचविण्यासाठी वर्गवारी-२ पार केलेल्या व आपले उपक्रम सुरु करण्याच्या मन:स्थितीत असलेल्या स्वयंसहायता गटांना एक वर्षासाठी मासिक लोकराज्यचे सभासदत्व देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. त्यासाठी खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत :-

अ) जुलै, २०१० पर्यंत वर्गवारी-२ पार केलेल्या गटांना व आपले उपक्रम सुरु केलेल्या गटांना मासिक लोकराज्यचे सभासद होण्यासाठी प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी मासिकाची वार्षिक वर्गणी प्रती बचत गट रु.५०/- याप्रमाणे जिल्हा माहिती अधिकारी, माहिती व जनसंपर्क विभाग यांचेकडे भरणा करावा.

ब) प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी आपल्या जिल्हयातील जुलै, २०१० पर्यंत वर्गवारी २ पार केलेल्या व आर्थिक उपक्रम सुरु केलेल्या स्वयंसहायता गटांची

नांवे व पत्रव्यवहाराचे पत्ते एकत्रित करुन जिल्हा माहिती अधिकारी, माहिती व जनंसपर्क विभाग यांचेकडे द्यावेत. मासिकांचे वितरण गटनिहाय करण्याची जबाबदारी माहिती व जनंसपर्क विभागाची असेल.

क) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी आपल्या जिल्ह्यातील आदर्श व सक्षम स्वयंसहायता गटांची यशोगाथा जिल्हा माहिती अधिकारी, माहिती व जनंसपर्क विभाग यांना पुरवावी.

ड) माहिती व जनंसपर्क विभागाने, दर महिन्यास, मासिकातील दोन पाने त्यासाठी राखून ठेवून जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडून प्राप्त झालेली माहिती संकलीत करुन छापावी.

इ) या वर्गणीचा खर्च स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेतील मुलभूत सुविधा या बाबीखाली असलेल्या उपलब्ध निधीतून भागवावा.

फ) स्वयंसहायता गटाच्या सभासदत्वासाठी केवळ एक वर्षापुरती वर्गणी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडून भरण्यात येईल. त्यानंतर या मासिकाची उपयुक्तता स्वयंसहायता गटांना वाटल्यास, ते स्वखर्चाने सभासद होतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

२७/०८/२०१०

(रा. शं. नागरे)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) प्रकल्प संचालक; जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व),

२) जिल्हा माहिती अधिकारी, माहिती व जनसंपर्क विभाग, (सर्व),

प्रत,

महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,

उप आयुक्त, (विकास), विभागीय आयुंक्त यांचे कार्यालय (सर्व)